राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानाच्या (NMAET) कृषी विस्तार उप अभियानांतर्गत, राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) योजनेकरिता अनुसूचित जाती प्रवर्गासाठीचा सन २०१९-२० या आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी सन २०२०-२१ च्या अर्थसंकल्पीय निधीतून वितरीत करणेबाबत.
केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २४०१बी३०१)
राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २४०१बी३१२)

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२०/प्र.क्र.०९/अर्थसंकल्प (विघयो)**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- १८ नोव्हेंबर, २०२०

<u>वाचा :</u>- १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६.०४.२०२०
२) केंद्रीय कृषि व शेतकरी कल्याण मत्रालयाचे पत्र क्र.एफन.३६-२८/२०१७-अेई, विस्तार कक्ष, दि.६.५.२०२० ची तीन पत्रे.
३) कृषि व पदुम विभागाची नस्ती क्र.पूरक-२०१९/प्र.क्र.१९८ (भाग-१)/३-अे,
४) शासन निर्णय समक्रमांक दि.२२.०९.२०२०

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषी विस्तार व तंत्रज्ञान अभियानांच्या (NMAET) कृषी विस्तार उप अभियानांतर्गत, राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांमध्ये सुधारणांकरिता सहाय्य (आत्मा) या योजनेसाठी अनुसूचित जाती घटकांकरिता सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, २४०१-पीक संवर्धन, ००, ७८९, अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (२३) कृषी उन्नती योजना-कृषी विस्तार अभियान- विस्तार विषयक कामांत सुधारणा करण्याकरिता राज्यांच्या विस्तार कार्यक्रमांना सहाय्य (केंद्र हिस्सा ६०टक्के) या लेखाशिर्षाखाली रु.८००.०० लाख, तर (०१) (२४) कृषी उन्नती योजना-कृषी विस्तार अभियान- विस्तार विषयक कामांत सुधारणा करण्याकरिता राज्यांच्या विस्तार कार्यक्रमांना सहाय्य (राज्य हिस्सा ४०टक्के) या लेखाशिर्षाखाली रु.४००.०० लाख इतका नियतव्यय मंजूर आहे. त्यापैकी दि.२२.०९.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये केंद्र हिस्सा (२४०१B३०१) या लेखाशिर्षाखाली रु.१०३.७३६५ लाख तसेच राज्य हिस्सा (२४०१B३१२) या लेखाशिर्षाखाली रु.९८.७९५ लाख असा एकूण रु.२०२.५३१५ इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील दिनांक १६ एप्रिल, २०२० रोजीच्या परिपत्रकान्वये राज्यात कोरोना विषाणूमुळे उद्भवलेली महामारीची परिस्थिती विचारात घेऊन सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाच्या पहिल्या ३ महिन्याकरिता अनिवार्य व कार्यक्रम खर्चाच्या एकूण वार्षिक अर्थसंकल्पित तरतूदींच्या १५ ते २५ टक्क्याच्या मर्यादेत ठराविक उद्दीष्टांसाठी निधी वितरीत करण्यास मंजूरी देण्यात आली आहे. तसेच केंद्र पुरस्कृत योजनांच्या मागील वर्षामधील निधी वितरणाकरिता वित्त विभागाची सहमती घेणे अनिवार्य केले आहे. या अनुषंगाने कृषी व पदुम विभागाच्या संदर्भाधीन नस्तीवर वित्त विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन व कृषी व पदुम विभागाच्या संदर्भाधीन क्र.३ येथील प्रस्तावास अनुसरुन सन २०१९-२० या वर्षातील अखर्चित निधी करीता उपरोक्त सन २०२०-२१ करीता अर्थसंकल्पीत तरतूदीतून केंद्र हिस्सा (२४०१B३०१) या लेखाशिर्षाखाली रु.१६०.०० लाख तसेच राज्य हिस्सा (२४०१B३१२) या लेखाशिर्षाखाली रु.१००.०० लाख असा एकूण रु.२६०.०० लाख इतका निधी प्रशासकीय विभाग

प्रमुख म्हणून सचिव, कृषी व पदुम विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. लॉक डॉऊनमुळे पुढील ३ ते ४ महिने राज्याची आर्थिक स्थिती अतिशय गंभीर स्वरुपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व कृषी व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१६.०४.२०२० च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१६.०४.२०२० रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२३३/२०२०/ व्यय-१, दि.०४.११.२०२० अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१११८१४३८५५१०२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Prashant Pundlik Wagh

Digitally signed by Prashant Pundlik Wagh
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice & Special Assist Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, serialNumber=5599270e38b296e5e5d814ff5976561a3ec66d875aeb425d735e1d7c12140929, cn=Prashant Pundlik Wagh
Date: 2020.11.18 14:40:54 +05'30'

( प्रशान्त पुं. वाघ )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) सचिव, कृषी व पदुमण विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) आयुक्त, कृषी, महाराष्ट्र राज्य
४) सर्व प्रादेशिक उप आयुक्त (समाजकल्याण) (समाजकल्याण आयुक्तालयामार्फत)
५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
६) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
७) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
९) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग.